**“प्रकल्प अंमलबजावणी समितीची (Project Implementation Committee) स्थापना करण्याबाबत”**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : सीईएन-२०२३/प्र.क्र. ४१७/२३/३३**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : १६ जून, २०२३.

**प्रस्तावना -**

भारत निवडणूक आयोगाकडून लोकसभा सार्वत्रिक निवडणूक - २०२४ च्या अनुषंगाने निवडणूक पूर्वतयारीचे कामकाज विहीत कालावधीमध्ये करण्यासंदर्भात अंदाजित वेळापत्रक जारी केले आहे. भारत निवडणूक आयोगाने दि. १०.०६.२०२३ च्या पत्राने लोकसभा व विधानसभा यांच्या सार्वत्रिक व पोट निवडणूकीच्या अनुषंगाने Poll Day Monitoring बाबत सुचना केल्या आहेत. सदर पत्रामध्ये CEO may create requisite IT tools for Poll Day Monitoring Activities. However, such IT tools shall be vetted and approved by the Technology Division of the Commission असे निर्देश देण्यात आले आहेत.

२. सदर निर्देशाच्या अनुषंगाने निवडणुकीच्या कार्यक्रमाकरीता तसेच मतदानाच्या दिवशी (POLL DAY) सर्व संबंधीत बाबींवर देखरेख ठेवण्याच्या अनुषंगाने SOFTWARE तयार करण्यासाठी सल्लागारांची नेमणूक करणे आवश्यक आहे. माहिती व तंत्रज्ञान विभागाच्या दि.०९.०५.२०१९ च्या शासन निर्णयान्वये माहिती व तंत्रज्ञान क्षेत्रातील प्रकल्पाकरीता एकूण ६ सल्लागारांची सुची तयार करण्यात आली असून एखाद्या विभागाला सल्लागार नियुक्तीच्या अनुषंगाने सदर शासन निर्णयातील तरतुदीनुसार कार्यवाही करणे आवश्यक आहे. सदर शासन निर्णयातील परिच्छेद ५ मध्ये सल्लागार कंपनीची नियुक्तीच्या कार्यपध्दतीच्या तरतूदी नमूद करण्यात आल्या आहेत.

३. सदर काम हे पूर्णतः तांत्रिक स्वरुपाचे आहे. त्यामुळे, माहिती व तंत्रज्ञान संचालनालयाच्या शासन निर्णय, दिनांक ०९ मे, २०१९ अन्वये शासनाचे विविध विभाग, त्यांच्या नियंत्रणाखालील कार्यालये, महामंडळे, मंडळे इत्यादींच्या e-Governance (IT Project) उपक्रमाला सल्ला विषयक सेवा देण्यासाठी शासनाने पुढीलप्रमाणे एकूण ६ कंपन्यांची निवड केली आहे.

१) M/s Deloitte
२) M/s Ernst & Young
३) M/s grant Thornton
४) M/s KPMG
५) M/s PwC
६) M/s Wipro

४. तरी, मतदानाच्या दिवशी (POLL DAY) सर्व संबंधीत बाबींवर देखरेख ठेवण्याच्या अनुषंगाने SOFTWARE तयार करण्याच्या प्रक्रीयेच्या तांत्रिक कामासाठी उपरोक्त सहा तांत्रिक सल्लागार कंपन्यांपैकी एका कंपनी मधून एका सल्लागाराची निवड करण्यासाठी शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग,

दिनांक २१.०९.२०१२ अन्वये विभागाची प्रकल्प अंमलबजावणी समिती (Project Implementation Committee) स्थापन करण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

वर नमूद केल्याप्रमाणे सहा तांत्रिक सल्लागार कंपन्यांपैकी एका कंपनीमधून एका सल्लागाराची निवड करण्यासाठी पुढीलप्रमाणे प्रकल्प अंमलबजावणी समिती स्थापन करण्यात येत आहे.

| | |
|---|---|
| अपर मुख्य सचिव व मुख्य निवडणूक अधिकारी | - अध्यक्ष |
| सचिव/प्रधान सचिव/अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग किंवा त्यांचे प्रतिनिधी | - सदस्य |
| सचिव/प्रधान सचिव/अपर मुख्य सचिव, वित्त विभाग किंवा त्यांचे प्रतिनिधी | - सदस्य |
| सचिव/प्रधान सचिव/अपर मुख्य सचिव, उद्योग विभाग किंवा त्यांचे प्रतिनिधी | - सदस्य |
| संचालक, माहिती व तंत्रज्ञान किंवा त्यांचे प्रतिनिधी | - सदस्य |
| उप सचिव व सह मुख्य निवडणूक अधिकारी, महाराष्ट्र राज्य | - सदस्य |
| अवर सचिव व उप मुख्य निवडणूक अधिकारी | - सदस्य सचिव |

२. सदर समितीने, उपरोक्त सहा तांत्रिक सल्लागार कंपन्यांना, मुख्य निवडणूक अधिकारी, महाराष्ट्र राज्य यांना अपेक्षित असलेल्या कामाची व्याप्ती स्पष्ट करुन, या समितीपुढे सादरीकरण करण्याच्या सूचना द्यावयाच्या आहेत. सदर सादरीकरणानंतर त्या-त्या सल्लागार कंपन्यांचे सादरीकरण व तांत्रिक क्षमता यांचा विचार करुन मुख्य निवडणूक अधिकारी, महाराष्ट्र राज्य यांना व्यवहार्य ठरेल अशा कंपनीमधून एक सल्लागार नेमण्याची शिफारस करावयाची आहे. निवडणूकीची पूर्वतयारी विचारात घेता या समितीने तातडीने ही कार्यवाही पूर्ण करणे अपेक्षित आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०६१६१७३३१५०४०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Digitally signed by MANOHAR RAMCHANDRA PARKAR
Date: 2023.06.16 18:00:49 +05'30'

**( म. रा. पारकर )**
**उप सचिव व सह मुख्य निवडणूक अधिकारी,**
**महाराष्ट्र राज्य**

**प्रत,**

१. अ.मु.स., वित्त विभाग/ नियोजन विभाग/ उद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
२. संचालक, माहिती व तंत्रज्ञान संचालनालय
३. मुख्य निवडणूक अधिकारी, महाराष्ट्र राज्य यांचे स्वीय सहायक
४. उप सचिव व सह मुख्य निवडणूक अधिकारी यांचे स्वीय सहायक
५. निवडनस्ती.